**मुद्रा बँक योजनेचा लाभ जास्तीत जास्त तरुणांना मिळावा यासाठी या योजनेचा प्रचार, प्रसार व समन्वयासाठी जिल्हास्तरावर गठित मुद्रा बँक योजना जिल्हा समन्वय समितीस निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसएलबीसी १६१६/प्र.क्र. १७७/का.१४१७**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०७ जानेवारी, २०१७.

**वाचा:**

1. **शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांक: एसएलबीसी १६१६/प्र.क्र.४९/का.१४१७ दि. १४ जून, २०१६.**
2. **वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २० एप्रिल, २०१६.**
3. **शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांक: एसएलबीसी १६१६/प्र.क्र. १७७/का.१४१७ दि. २२ नोव्हेंबर, २०१६.**

**प्रस्तावना:**

संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ अन्वये मुद्रा बँक योजना ग्रामीण, दुर्गम आणि अती दुर्गम भागात प्रभावीपणे माहिती होण्यासाठी आणि या योजनेचा लाभ गरजू आणि होतकरु व्यक्ती आणि बेरोजगार यांना व्हावा या हेतूने ग्रामीण आणि दुर्गम भागातील जनमानसात प्रभावीपणे प्रचार, प्रसार आणि समन्वय करण्याकरिता राज्यातील जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली मुद्रा बँक योजना समन्वय समितीची स्थापना करण्यात आली आहे. सदर निर्णयास अनुलक्षून मुद्रा बँक योजना जिल्हा समन्वय समितीकडून खर्चाबाबत प्रस्ताव मागविण्यात आले होते. सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी जिल्हाधिकारी कार्यालय पालघर, रायगड, सिंधुदुर्ग, धुळे, कोल्हापूर, वाशिम व भंडारा यांचेकडून मुद्रा बँक योजनेचा प्रचार, प्रसार आणि समन्वय करण्याकरीता निधी उपलब्ध करुन देण्याचे प्रस्ताव प्राप्त झाले असल्याने सदर जिल्हयांना निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

जिल्हा पालघर, रायगड, सिंधुदुर्ग, धुळे, कोल्हापूर, वाशिम व भंडारा येथील जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या मुद्रा बँक योजना जिल्हा समन्वय समितीस संदर्भाधीन शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांच्या अधिन राहून मुद्रा बँक योजनेचा प्रचार, प्रसार आणि समन्वय करण्याकरिता खालीलप्रमाणे रू. १,७४,२८,३४८ (अक्षरी रूपये एक कोटी चौऱ्याहत्तर लक्ष अठ्ठावीस हजार तीनशे अठ्ठेचाळीस फक्त) निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | मुद्रा बँक योजना जिल्हा समन्वय समिती | सन २०१६-१७ मध्ये द्यावयाचा निधी (रुपये) |
|---|---|---|
| १ | पालघर | २०,५०,००० |
| २ | रायगड | ५०,००,००० |
| ३ | सिंधुदुर्ग | ७,६५,००० |
| ४ | धुळे | ४१,३२,०२८ |
| ५ | कोल्हापूर | १९,२०,३२० |
| ६ | वाशिम | १४,३६,००० |
| ७ | भंडारा | २१,२५,००० |
| **एकूण** | | **१,७४,२८,३४८** |

**(एकूण रुपये एक कोटी चौऱ्याहत्तर लक्ष अठ्ठावीस हजार तीनशे अठ्ठेचाळीस फक्त)**

३. सदरहू निधी खर्च करताना संदर्भाधीन शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचे तसेच वित्त विभागाने संदर्भिय शासन परिपत्रकामध्ये दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

४. उपरोक्त निधी हा संबंधित जिल्हाधिकाऱ्यांच्या अधिनस्त ठेवण्यात यावा.

५. राज्य निवडणूक आयोगाचे वेळोवेळी निवडणूकी संदर्भातील आचारसंहितेचे निर्गमित होणारे आदेश विचारात घेऊन योग्य ती कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

६. उपरोक्त निधी हा लेखाशीर्ष मागणी क्रमांक ओ-७, ३४५१ सचिवालय-आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय (०१) नियोजन विभाग, (०१)(११) मुद्रा बँक योजनेचा प्रचार, प्रसार आणि समन्वय (योजनांतर्गत) (दत्तमत), २६ जाहिरात व प्रसिध्दी (३४५१ अे ००१) या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

७. सदर निधी कोषागार कार्यालयातून आहरित व संवितरीत करण्यासाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी हे नियंत्रक अधिकारी राहतील, तसेच संबंधित जिल्हा नियोजन अधिकारी हे आहरण व संवितरण अधिकारी असतील. सदर निधीच्या खर्चाचा ताळमेळ ठेवण्याची तसेच खर्चाची माहिती वेळोवेळी शासनाला देण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी म्हणून संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

८. हा शासन निर्णय वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २० एप्रिल, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०१०७११२७५३७३१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=55fdd77fa8877b50fd182206f763c590c30ce698809f79d37b145fd63e375059, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2017.01.07 11:30:33 +05'30'

**(प्रियांका रं. छापवाले)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. महालेखापाल कार्यालय (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
४. महालेखापाल कार्यालय (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. जिल्हाधिकारी, पालघर/रायगड/सिंधुदुर्ग/धुळे/कोल्हापूर/वाशिम/भंडारा.
७. जिल्हा नियोजन अधिकारी, पालघर / रायगड / सिंधुदुर्ग / धुळे / कोल्हापूर / वाशिम/भंडारा.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर / रायगड / सिंधुदुर्ग / धुळे / कोल्हापूर / वाशिम / भंडारा.
९. वित्त विभाग/व्यय-८, अर्थ-१६, मंत्रालय, मुंबई ३२.
१०. कार्यासन अधिकारी (का. १४११/१४२४), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
११. निवडनस्ती, कार्यासन १४१७.